इंद्रधनुष्य मोहिमेसाठी राज्यस्तरीय सुकाणू समिती स्थापन करणेबाबत.....

# महाराष्ट्र शासन
# सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मिइंद्र-२०१७/१२८६/प्र.क्र.४६२/कु.क.

गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला,
मंत्रालय,मुंबई - ४०० ००१
तारीख: १ सप्टेंबर, २०१७

**प्रस्तावना -**

सन्माननीय पंतप्रधान महोदयांनी देशातील ११८ जिल्हे, १७ नगरे, ईशान्य पूर्वच्या राज्यातील ५२ जिल्हयासाठी ९० टक्के पेक्षा जास्त लसीकरण करण्याचे उद्दिष्ट डिसेंबर २०१८ पर्यंत साध्य करण्यासाठी इंद्रधनुष्य मोहिम तीव्रतेने राबविण्याचे निर्देश दिले आहेत. त्यानुसार राज्यात उक्त मोहिमेचे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी व त्यावर पर्यवेक्षकीय सनियंत्रण ठेवण्यासाठी मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली सुकाणू समितीची स्थापना करण्याबाबत केंद्र शासनाने इंद्रधनुष्य तीव्र मोहिमेच्या कार्यपध्दती बाबत मार्गदर्शक सूचना दिल्या असून त्यातील प्रकरण ७ प्रमाणे सुकाणू समिती स्थापन करण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे. :-

**शासन निर्णय :-**

२. केंद्र शासनाच्या इंद्रधनुष्य तीव्र मोहिमेच्या कार्यपध्दती बाबत मार्गदर्शक सूचनेतील प्रकरण ७ प्रमाणे महाराष्ट्र राज्यात इंद्रधनुष्य तीव्र मोहिम राबविण्यासाठी राज्याच्या मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली सुकाणू समितीची स्थापना करण्यात येत आहे.सदर समितीत पुढील प्रमाणे सदस्य असतील :-

| | |
|---|---|
| अध्यक्ष | मा.मुख्य सचिव |
| सदस्य सचिव व संयोजक | अ.मु.स. / प्र.स./ सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग |
| सदस्य | अ.मु.स. / प्र.स./ सचिव, महिला व बालविकास विभाग, ग्राम विकास विभाग, नगर विकास विभाग, वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, अल्पसंख्याक विभाग, कामगार विभाग, माहिती व तंत्रज्ञान विभाग, गृह विभाग, उद्योग विभाग, आदिवासी विकास विभाग, परिवहन विभाग, उर्जा विभाग, या व्यतिरिक्त माहिती व जनसंपर्क संचानालय व अन्य आवश्यक अनुषंगिक विभागाचे विभाग प्रमुख |
| सहयोगी विकास सदस्य | युनिसेफ, रोटरी, आय.ए.पी., फोग्सी, ए.जी.पी. या संस्थाचे प्रतिनिधी |

३. **समितीची कार्यकक्षा** -

१) या मोहिमेसाठी संबंधित विभागांची जबाबदारी व सहभाग सुनिश्चित करणे.

२) राज्यस्तरीय व जिल्हा स्तरीय कृती दलाच्या समितीच्या कार्याचे संनियंत्रण पर्यवेक्षण करणे

३) इतर विभागाच्या सहकार्याने मनुष्यबळ व इतर साधनसामुग्रीसाठी नियोजन करणे.
४) मोहिम राबविण्याची उत्कृष्ट कामगिरी करणाऱ्या जिल्हा / तालुका / नागरी विभागातील वार्डना पुरस्कृत करण्याची उपाययोजना करणे.
५) आढाव्यात निदर्शनांस आलेल्या त्रुटींचे निराकरण करण्यासाठी आवश्यक उपाययोजना करुन त्यांचे पुढील मोहिमेत समावेश करणे.

सदरहू सुकाणू समितीच्या बैठका पुढीलप्रमाणे होणे अपेक्षित आहे:-

१) प्रथम टप्पा पूर्वतयारीसाठी
२) दुसरी बैठक पहिली फेरी सुरु होण्यापूर्वी मोहिम राबविण्यासाठी आवश्यक तयारी झाली किंवा कसे याचा आढावा घेण्यासाठी तद्नंतर प्रत्येक फेरीनंतर झालेल्या कामगिरीचा आढावा घेण्यासाठी अंतिम आढावा.

४. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८३११८०२४२१३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2017.09.01 14:20:11 +05'30'

( व.मुं.भरोसे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) माननिय मंत्री (सर्व विभाग) मंत्रालय, मुंबई
३) मा.राज्यमंत्री (सा.आ.वि.), मंत्रालय, मुंबई
४) मा.विरोधी पक्ष नेता, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिवांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग), मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव, विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
८) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
९) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
१०) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा कुटुंब कल्याण, पुणे
११) निवडनस्ती